


# राज्यशास्त्र परिभाषा कोश

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन




महाराष्ट्र शासन

# राज्यशास्त्र परिभाषा कोश

संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई




महाराष्ट्र शासन

# राज्यशास्त्र परिभाषा कोश

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई

## राज्यशास्त्र उपसमिती

### अध्यक्ष

डॉ. ना. र. देशपांडे, नागपूर विद्यापीठ, नागपूर

### प्रतिनिधी–सदस्य

डॉ. य. दि. फडके, मुंबई विद्यापीठ, मुंबई
डॉ. ना. र. इनामदार, पुणे विद्यापीठ, पुणे
डॉ. ना. य. डोळे, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
प्रा. ना. द. साखरीकर, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
श्रीमती रोहिणी गवाणकर, श्रीमती ना. दा. ठा. महिला विद्यापीठ, मुंबई
प्रा. कृ. ना. वळसंगकर, मराठी विज्ञान परिषद, मुंबई

### सदस्य–सचिव

डॉ. न. ब. पाटील, भाषा सहसंचालक

# प्रस्तावना

मातृभाषा शिक्षणाचे माध्यम असावे हे आता सर्वमान्य झाले आहे. महाराष्ट्र राज्यात मराठीला राजभाषेचे स्थान मिळाल्यानंतर पदवी परीक्षे-पर्यंतच्या शिक्षणाचे माध्यम मराठी असावे हा विचार दृढ झाला. माध्यमाचे हे परिवर्तन घडवून आणण्यात अर्थातच अडचणी होत्या, मुख्य म्हणजे शास्त्रीय व तांत्रिक विषयांसाठी आवश्यक असलेला पारिभाषिक शब्दसंग्रह हाताशी नव्हता. निरनिराळे विषय शिकवण्यासाठी आवश्यक असलेली पाठ्यपुस्तके व संदर्भ पुस्तके मराठीतून लिहिली गेली नव्हती. काही विद्यापीठांनी या दृष्टीने प्रयत्न केले होते. परंतु ते मर्यादित स्वरूपाचे व त्यांच्यापुरते होते. सर्व विद्या-पीठांतून समान व एकरूप परिभाषा वापरली जावी यासाठी नव्याने प्रयत्न करणे आवश्यक होते.

या सर्व गोष्टींचा सांगोपांग विचार करण्यासाठी १९६७ साली महाराष्ट्रा-तील सर्व विद्यापीठांचे कुलगुरू व भाषा सल्लागार मंडळाचे सदस्य यांची संयुक्त बैठक घेण्यात आली. या बैठकीत भाषा संचालनालयाने सर्व विज्ञान-विषयक व मानव विद्याविषयक विषयांची परिभाषा विद्यापीठांच्या सहकार्याने तयार करावी आणि संदर्भ ग्रंथांच्या व क्रमिक पुस्तकांच्या निर्मितीचे काम महाराष्ट्र राज्य विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ व महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ यांच्याकडे सोपवावे असे ठरले.

वरील निर्णयाच्या अनुरोधाने भाषा संचालनालयाने शास्त्रीय व मानविकी विद्याशाखांमधील काही मूलभूत विषयांच्या समित्या प्रथम स्थापन करून व काही निर्देशक तत्त्वे ठरवून परिभाषा निर्मितीच्या कामास सुरुवात केली. या समित्यांवर सर्व विद्यापीठांचे प्रतिनिधी आणि मराठी विज्ञान परिषदेचा प्रतिनिधी यांना सदस्य म्हणून नेमण्यात आले. परिभाषा तयार करताना, ही परिभाषा केवळ प्रादेशिक स्तरापुरतीच मर्यादित न राहता अन्य भारतीय भाषांनाही ती जवळची वाटेल याचे भान ठेवावे लागले. त्यामुळे ही परिभाषा मराठी भाषेच्या प्रकृतीला बाधा न येता केंद्र सरकारने तयार केलेल्या परि-भाषेशी शक्यतो मिळतीजुळती ठेवण्याचा प्रयत्न करण्यात आला.

आतापर्यंत भाषा संचालनालयाने गणित, रसायन, समाज, वाणिज्य, तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान, ग्रंथालय, शारीर, भूशास्त्र, भौतिक, शिक्षण, यंत्र अभियांत्रिकी, स्थापत्य अभियांत्रिकी, विद्युत अभियांत्रिकी, कृषिशास्त्र, शरीर-क्रियाशास्त्र व जीवशास्त्र या विषयांचे परिभाषा कोश प्रसिद्ध केले आहेत. तसेच अर्थशास्त्र, धातुशास्त्र, भूगोल, भाषाशास्त्र, साहित्य समीक्षा, संख्याशास्त्र व गणितशास्त्र (सुधारित) रसायनशास्त्र (सुधारित), व्यवसाय व्यवस्थापन, मानसशास्त्र, विकृतिशास्त्र या विषयांच्या परिभाषेचे काम पूर्ण झाले असून तेही कोश यथावकाश प्रसिद्ध करण्यात येतील. प्रस्तुत राज्यशास्त्र परिभाषा कोश हा या प्रकल्पातील एक टप्पा आहे.

राज्यशास्त्र परिभाषा निर्मितीचे काम एक समिती नेमून पूर्ण करण्यात आले आहे. समितीच्या एकूण ६० बैठकी घेण्यात आल्या व सुमारे ५,००० इंग्रजी पारिभाषिक संज्ञांचे मराठी पर्याय निश्चित करण्यात आले. हा परिभाषा कोश तयार करताना समितीने, या विषयातील विद्यापीठीय स्तरावरील पारिभाषिक संज्ञा विचारात घेतल्या तसेच संदर्भादाखल, केंद्र सरकारने तयार केलेल्या शब्दसंग्रहाचाही वापर केला.

प्रस्तुत कोशाचे मुद्रण चालू असतानाच राज्यशास्त्र उपसमितीचे अध्यक्ष डॉ. ना. र. देशपांडे यांचे आकस्मिक निधन झाले याबद्दल अतीव दु:ख होते. अध्यक्ष या नात्याने डॉ. देशपांडे यांनी परिभाषा निर्मितीच्या या कामात बहुमोल मार्गदर्शन केले होते.

अनेक तज्ञ व मान्यवर व्यक्तींच्या सहकार्याने तयार झालेला हा कोश या क्षेत्रातील प्राध्यापक, लेखक व विद्यार्थी यांना तसेच, या विषयाची आस्था असणाऱ्या अन्य व्यक्तींना व सर्व संबंधित शास्त्रीय विभागांना उपयुक्त व मार्गदर्शक ठरेल असा विश्वास वाटतो.

**न. ब. पाटील**
भाषा संचालक,
महाराष्ट्र राज्य.

भाषा संचालनालय,
मुंबई–४०० ०३२

# कोश परिचय

## कोशाची रचना पुढीलप्रमाणे आहे :–

इंग्रजी शब्द व शब्दानुक्रम :—इंग्रजी शब्द देताना मुख्यत्वेकरून Chambers' Technical Dictionary व Webster's New International Dictionary यांचा, तसेच या विषयाशी संबंधित असलेल्या अन्य कोशांचा वर्णलेखन (spelling) इत्यादींसाठी आधार घेतला आहे.

इंग्रजी शब्दजाती :—प्रत्येक एकेरी संज्ञेपुढे तिची शब्दजाती दर्शविली आहे. (जसे :— *n*; *adj*; *v. t.*; *v. i.* इ.) इंग्रजी दोन किंवा अधिक शब्द असलेल्या संज्ञेपुढे शब्दजाती दर्शविलेली नाही.

विषयनिर्देशक संक्षेप :—एखादी इंग्रजी पारिभाषिक संज्ञा विशिष्ट पोटविषयाशी संबंधित असेल तर पर्याय देण्यापूर्वी तो विवक्षित विषय दर्शविणारा संक्षेप इंग्रजी इटॅलिक मुद्राक्षरात दिला आहे.

पर्याय, अर्थच्छटा, स्पष्टीकरणे :—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती, विषयनिर्देशक संक्षेप (असल्यास) दिल्यानंतर तिचे एक किंवा अधिक मराठी पर्याय दिले आहेत. पर्याय देताना वेगवेगळ्या अर्थच्छटा असल्यास त्यांना क्रमांक दिले आहेत. काही ठिकाणी अर्थ अधिक स्पष्ट व्हावा म्हणून पर्यायापूर्वी कंसात इंग्रजी स्पष्टीकरण दिले आहे किंवा काही ठिकाणी पर्यायानंतर कंसात मराठी स्पष्टीकरणही दिले आहे. पर्यायांचा वापर यथार्थपणे व्हावा यासाठी आवश्यक तेथे कंसात "as in :" असे देऊन त्या पर्यायाचा उपयोग करून दाखवला आहे.

मराठी शब्दजाती :—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती दर्शविली असल्याने व त्यानुसार मराठी पर्याय घेतला असल्याने मराठी शब्दजाती वेगळी दर्शविली नाही.

लिंगनिर्देश :—(१) प्रत्येक मराठी एकेरी पर्यायापुढे तो नाम असल्यास लिंगनिर्देश केला आहे. (२) इंग्रजी संज्ञा एकेरी असल्यास तिच्या जोडशब्द असलेल्या मराठी पर्यायापुढे लिंगनिर्देश केला आहे.

शब्दकुळे :—शब्दकुळांतील शब्दांची आधारभूत कल्पना एकच असते, परंतु त्यांतील शब्द सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त करून आपली भिन्नता दर्शवितात. असे शब्द त्यातल्या महत्त्वाच्या

शब्दाखाली पर्यायानंतर *cf.* असे दर्शवून एकत्रितपणे दिले आहेत. तसेच त्या शब्दकुळातील शब्द, कोशात त्यांच्या वर्णक्रमानुसार योग्य त्या ठिकाणी दिले आहेत व तिथे *cf.* असे म्हणून ज्या इंग्रजी संज्ञेखाली हे कूळ आले आहे त्या इंग्रजी संज्ञेचा निर्देश केला आहे. उदा. पृष्ठ १७ वरील charge हे कूळ पहावे. अशा तऱ्हेने शब्दकुळाखाली सर्व शब्द एकत्र आणण्याच्या या पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

जोडसंज्ञा :—काही महत्त्वाच्या पारिभाषिक जोडसंज्ञांखाली या संज्ञांतील इतर महत्त्वाचे प्रकार दर्शविणाऱ्या संज्ञा एकत्र आणल्या आहेत. उदा. पृष्ठ २१ वरील committee ही संज्ञा पहावी. याही पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

दुसरे असे की, प्रस्तुत राज्यशास्त्रात येणाऱ्या विविध करार अथवा ऐतिहासिक घटनांची माहिती थोडक्यात दिली आहे. उदाहरणार्थ पृष्ठ २१ वरील communist manifesto ही संज्ञा पहावी.

समानार्थी शब्द :—काही इंग्रजी शब्द जवळजवळ समानार्थी असल्याने त्यांना मराठी पर्याय देताना हे शब्द समानार्थी आहेत हे दर्शविण्यासाठी एकाच ठिकाणी दिले आहेत. ज्या शब्दासमोर पर्याय दिला आहे त्या शब्दासमोर कंसात (*also*) असे देऊन दुसरा समानार्थी शब्द दर्शविला आहे व कंसातील शब्द त्याच्या वर्णक्रमानुसार ज्या ठिकाणी आला असेल त्या ठिकाणी त्या शब्दासमोर (=) अशी खूण दर्शवून पर्याय ज्या शब्दासमोर दिला आहे तो शब्द दर्शविला आहे. त्याचप्रमाणे इंग्रजी शब्दाच्या वर्णलेखनात (spelling) थोडा फेरफार असलेले इंग्रजी शब्दही वरील पद्धतीनेच दर्शविण्यात आले आहेत.

## भाषा सल्लागार मंडळाने वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेच्या निर्मितीसाठी आधारभूत म्हणून ठरवून दिलेली

# निदेशक तत्त्वे

१. **शब्दसंग्रह व पर्याय.**—हिंदी वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेची निर्मिती करताना, केंद्र सरकारने विज्ञान व तंत्र क्षेत्रात यापूर्वी झालेल्या कार्याचा आढावा घेतला होता आणि निरनिराळ्या राज्यांत याबाबत झालेल्या एकूण कार्याचा समन्वय करण्याचे प्रयत्नही केले होते. मराठी परिभाषेची निर्मिती करताना देखील त्याच धोरणाचा अवलंब करून प्रत्येक विद्याशाखेतील शब्दांचे संकलन करणे अगत्याचे आहे. त्यासाठी प्रत्येक विद्याशाखेची केंद्र सरकारने तयार केलेली विज्ञान शब्दावली आधारभूत मानून, पुणे विद्यापीठ, माध्यमिक शिक्षण मंडळ आणि इतर विज्ञान संस्था यांच्या शब्दावलींचाही विचार करावा. तसेच माध्यमिक स्तरावरील वैज्ञानिक व तांत्रिक विषयांच्या पाठ्यपुस्तकातून पुष्कळशा तांत्रिक शब्दांचे जे पर्याय रूढ झाले आहेत ते देखील विचारात घ्यावेत.

२. **आंतरराष्ट्रीय संज्ञा.**—"आंतरराष्ट्रीय संज्ञा" या शक्यतोवर त्याच्या इंग्रजी स्वरूपातच ठेवाव्यात व त्यांचे मराठी भाषेत लिप्यंतरण करावे.

आंतरराष्ट्रीय संज्ञात साधारणतः पुढील गोष्टींचा समावेश होतो :—

(अ) मूलद्रव्ये आणि संयुगे (महत्त्वपूर्ण पदे, उपपदे वगैरेंसह) यांची नावे; ही नावे लिप्यंतरित करून देताना नावापुढे त्यांची संकेतचिन्हे सुद्धा द्यावीत. जसे : हायड्रोजन (H), कार्बन (C).

मात्र, मूलद्रव्ये आणि संयुगे यांसाठी वापरण्यात येणारी संकेतचिन्हे व संक्षेप इंग्रजी लिपीत जशीच्या तशीच ठेवावीत. जसे :—किरणोत्सारी थोरिअमचा समस्थानीय $90th^{228}$, निकोटीन $C_{10} H_{14} N_2$

रासायनिक चिन्हांकित समीकरणे, त्यांची इंग्रजीतील संकेतचिन्हे जशीच्या तशी ठेवून, पुढीलप्रमाणे द्यावीत :—



गंधक, रुपे, तांबे, कथील, पारा, जस्त, शिसे इत्यादी रूढ शब्द वर्णनात तसेच राहावेत; परंतु संयुगामध्ये मात्र त्यांचा वापर करू नये.

(ब) वजने, मापे आणि परिमाणे, जसे : कॅलरी, ॲम्पिअर वगैरे.

(क) विशेषनामे व त्या नामांवरून घेतलेल्या संज्ञा मूळ भाषेतील त्यांच्या उच्चारानुरूप लिहाव्यात.

जसे.– फॅरनहीट श्रेणी (फॅरनहीट), व्होल्टमीटर (व्होल्टा), अँपिअर (अँपिअर).

(ड) वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, भूविज्ञान इत्यादींसारख्या शास्त्रीय विषयांमधील द्विपद नामसंज्ञा.

(इ) रेडिओ, पेट्रोल, रडार, इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन, प्रोटॉन यासारखे नवीन शब्द.

(फ) गणित व इतर शास्त्रांमध्ये वापरण्यात येणारे संख्यांक, संकेतचिन्हे, सूत्रे वगैरे. जसे.– Sin, Cos, Tan, Log.

तथापि, वर निर्दिष्ट केलेल्या पारिभाषिक संज्ञांपैकी पुष्कळशा संज्ञांना मराठीत योग्य पर्याय असून ते शाळा व महाविद्यालये इत्यादींत कित्येक वर्षांपासून रूढ झाले आहेत.

जसे : ऑक्सिजन-प्राणवायू, कॅलरी-उष्मांक, Sin–ज्या, Cos–कोज्या वगैरे. तेव्हा आंतरराष्ट्रीय संज्ञा त्यांच्या इंग्रजी स्वरूपात जशाच्या तशा लिप्यंतरित करून देताना त्याबरोबरच त्या संज्ञांना मराठीत रूढ असलेले पर्याय देखील द्यावेत.

३. जी संकेतचिन्हे असतील ती त्यांच्या आंतरराष्ट्रीय स्वरूपातच राहू द्यावीत. तथापि, संज्ञांचे संक्षेप देवनागरी लिपीतून दर्शवावेत. म्हणजे सेंटिमीटर या संज्ञेचा संक्षेप सें. मी. असा देवनागरी लिपीत द्यावा.

४. वैज्ञानिक व तांत्रिक पारिभाषिक शब्दांसाठी पर्यायांची निश्चिती करताना, अर्थाची निश्चितता व सुबोधता यावर अधिक भर द्यावा व मराठी भाषेच्या प्रकृतीशी अविरोधी असे व शक्यतोवर भारतीय भाषांत वापरता येतील असेच पर्याय निवडावेत.

५. विवक्षित वैज्ञानिक शब्दांसाठी जे देशीय पर्याय मराठी भाषेत प्रचलित आहेत ते आणि सर्वसाधारण वापरण्यात येणारे पर्याय राहू द्यावेत.

६. विदेशी भाषांमधील जे शब्द मराठी भाषेत प्रचलित आहेत ते तसेच ठेवावेत. जसे.– मशीन, इंजिन, मीटर, लिटर वगैरे.

७. हे पर्याय मराठी व्याकरणानुसार प्रातिपदिक रूपात द्यावेत.

८. **मिश्र शब्दांची निर्मिती.–** वैज्ञानिक परिभाषा तयार करताना pasteurisation– "पाश्चरीकरण" ; voltage– "व्होल्टता" अशांसारखे मिश्र शब्द बनवणे हे भाषेच्या स्वाभाविक प्रवृत्तीस अनुसरून असल्यामुळे गरजेनुसार असे शब्द तयार करावेत.

९. जरूर तेथे समान अर्थी पारिभाषिक शब्दांची कुळे लक्षात घेऊन पारिभाषिक शब्द निश्चित करावेत.

* * *

# संक्षेप सूची

| | | | |
|---|---|---|---|
| *Acctt.* | .. Accounts | अ. व. | .. अनेकवचन |
| *adj.* | .. adjective | न. | .. नपुंसकलिंग |
| *adv.* | .. adverb | पु. | .. पुल्लिंग |
| *Admin.* | .. Administration | सा. | .. सामान्य लिंग |
| *cf.* | .. compare | स्त्री. | .. स्त्रीलिंग |
| *com.* | .. commerce | | |
| *Dipl.* | .. Diplomacy | | |
| *Econ.* | .. Economics | | |
| in comb . | .. in combination | | |
| *n.* | .. noun | | |
| *Parl. Practice* | .. Parliamentary Practice | | |
| *pfx.* | .. prefix | | |
| *pl.* | .. plural | | |
| *suff.* | .. suffix | | |
| *v.i.* | .. verb, intransitive | | |
| *v. t.* | .. verb, transitive | | |
| *v. t. & i.* | .. verb, transitive and intransitive | | |

# A

**AAPSO,** (Afro-Asian Peoples' Solidarity Organisation) आफ्रो-आशियाई लोकांची दृढता संघटना
**abandonment,** *n.* परित्याग (पु.)
**abdication,** *n.* पदत्याग (पु.)
**abduct,** *v.t.* अपहरण करणे
**abduction,** *n.* अपहरण (न.)
**abettor,** *n.* अपप्रेरक (सा.)
**ability,** *n.* समर्थता (स्त्री.)
*cf.* capability शक्तता
capacity सामर्थ्य
competence क्षमता
efficiency पात्रता
fitness योग्यता
qualification अर्हता
**ability theory,** क्षमता सिद्धांत
**abjuration,** *n.* शपथपूर्वक त्याग (पु.)
**abnormal,** *adj.* अपसामान्य
**abolish,** *v.t.* निरास करणे, नाहीसा करणे *cf.* cancel
**abolition,** *n.* निरास (पु.)
**abolitionism,** *n.* निरासवाद (पु.), निराकरण-वाद (पु.) (अमेरिकेतील निग्रो गुलामगिरी प्रथा नष्ट करण्याचा आग्रह धरण्याविषयीचा सिद्धांत)
**abolitionist,** *n.* निरासवादी (सा.), निरासक (सा.)
**aboriginals,** *n. pl.* आदिवासी (सा. अ. व.)
**aborigines,** *n. pl.* आदिवासी (सा. अ. व.), आदिवासी लोक (पु. अ. व.)
**above politics,** राजकारणातीत पवित्रा, राजकारणातीततेचा पवित्रा
**abrogate,** *v.t.* १ उत्सादन करणे २ निराकरण करणे *cf.* cancel
**absent,** *v.t.* अनुपस्थित राहणे, गैरहजर राहणे
**absenteeism,** *n.* १ अनुपस्थिति पद्धति (स्त्री.) २ अन्यत्रवासी पद्धति (स्त्री.)
**absentee voter,** अनुपस्थित मतदार
**absentee voting,** अनुपस्थितांचे मतदान
**absolute,** *adj.* १ (as, a rule) निरपवाद २ (as, a power), निरंकुश ३ (as against relative) निरपेक्ष ४ निर्विवाद ५ संपूर्ण
**absolute justice,** केवल न्याय
**absolute liberty,** अबाधित स्वातंत्र्य
**absolute majority,** निर्विवाद बहुमत
**absolute monarchy,** निरंकुश राजसत्ता, निरंकुश राजेशाही
**absoluteness of Sovereignty,** सार्वभौमत्वाची निरंकुशता
**absolute title,** निरपवाद हक्क
**absolutism,** *n.*१ निरंकुशतावाद (पु.) २ निरपेक्षतावाद (पु.)

**abstract**, *n.* १ संक्षेप (पु.) २ गोषवारा (पु.), सार (न.) ३ *Admin.* (as, a return) विवरण (न.)
*v.t.* १ संक्षिप्त करणे २ गोषवारा काढणे, सार काढणे
*adj.* १ संक्षिप्त, बिनतपशील २ (not concrete) अमूर्त ३ (abstruse) गूढ ४ (as applied to sciences) केवल, शुद्ध
**abstraction**, *n.* अमूर्तीकरण (न.)
**academic freedom**, विद्याक्षेत्रीय स्वातंत्र्य
**academy**, *n.* १ अकादमी (स्त्री.) २ (school or place of training in which some special art is taught) प्रबोधिका (स्त्री.)
**acceptance**, *n.* स्वीकृति (स्त्री.), स्वीकार (पु.)
*cf.* assent
**accession**, *n.* (the act of becoming joined as in a confederation or union) १ सामिलीकरण (न.) २ राज्यारोहण (न.) ३ पदारोहण (न.)
**accommodation**, *n.* समायोजन (न.)
**accomplice**, *n.* १ साथीदार (सा.) २ सह अपराधी (सा.)
**accountability**, *n.* उत्तरदायित्व (न.)
**accountable**, *adj.* उत्तरदायी
**accountancy**, *n.* १ लेखाशास्त्र (न.) २ लेखा-व्यवहार (पु.)
**accountant**, *n.* लेखापाल (सा.)
**Accountant General**, महालेखापाल (सा.)
**accounting and audit**, लेखांकन व लेखापरीक्षा
**accounting management**, लेखांकन व्यवस्थापन
**accounts officer**, लेखा अधिकारी
**accredit**, *v.t.* १ श्रेय देणे २ अधिस्वीकृती देणे
**accreditation**, *n.* अधिस्वीकृति (स्त्री.)
**accredited**, *adj.* अधिस्वीकृत
**accretion**, *n.* उपवृद्धि (स्त्री.)
**accrual**, *n.* उपार्जन (न.)
**acculturation**, *n.* अभिसंस्करण (न.)
**accumulation**, *n.* संचयन (न.)
**accuse**, *v. t.* आरोप ठेवणे
*cf.* charge
**achieved role**, साधित भूमिका, स्वतः-साध्य भूमिका
**acquiescence**, *n.* मूकसंमति (स्त्री.)
*cf.* assent
**acquire**, *v. t.* संपादन करणे
**acquisition**, *n.* संपादन (न.)
**acquisitiveness**, *n.* परिग्रहशीलता (स्त्री.)
**acquisitive society**, परिग्रही समाज
**acquit**, *v.t.* १ दोषमुक्त करणे २ ऋण चुकते करणे, कर्ज फेडणे ३ कामगिरी बजावणे
**acquittal**, *n.* दोषमुक्ति (स्त्री.)
**Act**, *n.* अधिनियम (पु.)
**acting**, *adj.* हंगामी
*cf.* in-charge प्रभारी
officiating स्थानापन्न
provisional तात्पुरता
temporary अस्थायी
working कार्यकारी
**action research**, कृतिप्रवण संशोधन
**activism**, *n.* क्रियावाद (पु.)
**activist**, *n.* क्रियावादी (सा.)
**act of grace**, कृपादान (न.)
**act of parliament**, संसद अधिनियम
**act of state**, राज्यसंस्थेची कृति
**actual**, *adj.* प्रत्यक्ष
**actual will**, श्रेयस्करी ईहा
**actuarial reserve**, (special pension fund) विमागणितीय निधि, विमागणित निधि
**actuary**, *n.* विमागणक (सा.)
**adaptation**, *n.* अनुकूलन (न.)
**adaptive function**, अनुकूली कार्य
**adaptive subsystem**, अनुकूली उपव्यवस्था

**address**, *n.* १ (formal document embodying a request) विनंतिपत्र (न.) २ मानपत्र (न.) ३ (a formal speech) अभिभाषण (न.), भाषण (न.) ४ (deportment) चालचर्या (स्त्री.)
*v.t.* १ संबोधणे २ –ला उद्देशून लिहिणे ३ अभिभाषण करणे, भाषण करणे

**adherence**, *n.* चिकटून राहणे (न.)

**adhesion**, *n.* आसंग (पु.)

*ad hoc* **appointment**, तदर्थ नियुक्ति, तदर्थ नेमणूक

*ad hoc* **authority**, १ तदर्थ प्राधिकारी २ तदर्थ प्राधिकरण

*ad hoc* **committee**, तदर्थ समिति

*ad hoc* **grant**, तदर्थ अनुदान

*ad-hocism*, *n.* तदर्थवाद (पु.)

*ad infinitum*, *Law* निरवधि

*ad interim*, अंतरिम कालीन

**adjective law**, प्रक्रिया विधि

**adjourn**, *v.t. & i.* स्थगित करणे, स्थगित होणे

**adjournment**, *n.* स्थगन (न.)

**adjournment motion**, स्थगन प्रस्ताव

**adjournment** *sine die*, बेमुदत स्थगन

**adjudicate**, *v.t.* अभिनिर्णय करणे

**adjudication**, *n.* अभिनिर्णय (पु.)

**adjudicator**, *n.* अभिनिर्णेता (पु.)

**adjudicatory procedure**, अभिनिर्णयी कार्यपद्धति

**adjust**, *v.t.* समायोजन करणे, जुळवून घेणे, जमवून घेणे

**adjustment**, *n.* समायोजन (न.)

**adjutant**, *n.* ॲडज्युटंट (पु.)

**Adjutant General**, ॲडज्युटंट जनरल

**administration**, *n.* प्रशासन (न.)
- **agricultural administration** कृषि प्रशासन
- **business administration** व्यापार प्रशासन
- **civil administration** नागरी प्रशासन
- **industrial administration** औद्योगिक प्रशासन
- **military administration** सैनिकी प्रशासन
- **private administration** खाजगी प्रशासन, निजी प्रशासन
- **public administration** लोक प्रशासन

**administration and management**, प्रशासन आणि व्यवस्थापन

**administration and politics**, प्रशासन आणि राजकारण

**administration of government**, शासनाचे प्रशासन

**administration personnel**, प्रशासन कर्मचारीवर्ग

**administration : public and private**, प्रशासन : लोक व निजी, प्रशासन : लोक व खाजगी

**administrative**, *adj.* प्रशासनिक, प्रशासकीय, प्रशासन–

**administrative activity**, प्रशासकीय कार्यक्रम, प्रशासनिक क्रियाकलाप

**administrative adjudication**, प्रशासनिक अभिनिर्णय

**administrative areas and field services**, प्रशासनिक क्षेत्रे व क्षेत्रीय सेवा

**administrative assistant**, प्रशासकीय सहायक

**administrative behaviour**, प्रशासनिक वर्तन

**administrative class**, प्रशासनिक वर्ग, प्रशासकीय वर्ग

**administrative code and manuals**, प्रशासनिक संहिता व नियमपुस्तिका, प्रशासनिक संहिता व नियमपुस्तके

**administrative county**, प्रशासनिक कौंटी

**administrative court**, प्रशासनिक न्यायालय

**administrative decision**, प्रशासकीय निर्णय, प्रशासनिक निर्णय

administrative discretion, प्रशासकीय स्वेच्छानिर्णय, प्रशासकीय स्वविवेक
administrative economy, efficiency & convenience, प्रशासनिक काटकसर, कार्यक्षमता व सोय
administrative efficiency, प्रशासकीय कार्यक्षमता
administrative executive, १ प्रशासकीय कार्यकारिणी २ प्रशासनिक कार्यकारी अधिकारी
administrative integrity, प्रशासनिक इमानत, प्रशासनिक सचोटी
administrative jurisdiction, प्रशासकीय अधिकारिता
administrative justice, प्रशासकीय न्याय
administrative law, प्रशासनिक विधि, प्रशासनिक कायदा
administrative order, प्रशासनिक आदेश, प्रशासकीय आदेश
administrative organisation, प्रशासनिक संघटना, प्रशासनिक संघटन
administrative organisation and social system, प्रशासकीय संघटना आणि सामाजिक पद्धति
administrative phenomenon, प्रशासनिक घटना
administrative politics, प्रशासनिक राजकारण
administrative power, प्रशासकीय शक्ति, प्रशासनिक शक्ति
administrative procedure, प्रशासनिक कार्य-पद्धति
Administrative Procedure Act, प्रशासकीय कार्यपद्धति अधिनियम
administrative process, प्रशासनिक प्रक्रिया
administrative process school, प्रशासकीय प्रक्रिया संप्रदाय
administrative reform movement, प्रशासकीय प्रक्रिया चळवळ, प्रशासकीय सुधार आंदोलन
administrative regulation, प्रशासकीय विनिमय
administrative reporting, प्रशासकीय प्रतिवेदन
administrative secrecy, प्रशासकीय गुप्तता
administrative service, प्रशासकीय सेवा, प्रशासन सेवा
administrative staff college, प्रशासकीय अधिकारी महाविद्यालय
administrative state, प्रशासकीय राज्य
administrative structure, प्रशासनिक संरचना, प्रशासकीय संरचना
administrative system, प्रशासनिक व्यवस्था
administrative training, प्रशासकीय प्रशिक्षण
administrative tribunal, प्रशासकीय न्याया-धिकरण, प्रशासन न्यायाधिकरण
administrative units, प्रशासनिक एकक
administrator, *n.* प्रशासक (सा.)
admiral, *n.* ॲडमिरल (पु.), नौसेनापति (पु.), दर्यासारंग (पु.)
admiralty, *n.* ॲडमिरलपद (न.), नौसेना-पतिपद (न.)
admiralty court, नौविधि न्यायालय
admiralty jurisdiction, १ नौविधि अधि-कारिता २ ॲडमिरलची अधिकारिता
admiralty law, नौविधि (पु.)
adoption, *n.* १ दत्तविधान (न.) २ स्वीकृति (स्त्री.) ३ अंगीकार (पु.)
adulteration, *n.* भेसळ (स्त्री.)
adultery, *n.* जारकर्म (न.)
adult suffrage, प्रौढ मताधिकार
adumbrate, *v.t. & i.* १ झलक दाखविणे २ प्रसादचिन्ह दिसणे
*n.* १ झलक (स्त्री.) २ प्रसादचिन्ह (न.)
*ad valorem*, मूल्यानुसार
*ad valorem* duty or tax, मूल्यानुसार शुल्क किंवा कर
advance copy, आगाऊ प्रत
advance man, पूर्वयोजक (पु.)

**adventurism,** *n.* साहसवाद (पु.)
**advertisement tax,** जाहिरात कर
**advice and consent,** अमेरिकेच्या अध्यक्षाच्या नियुक्ती व संधी करण्यासंबंधीच्या अधिकारांवर सेनेटने नियंत्रण ठेवण्याची घटनात्मक तरतूद
**advisory ballot,** समुपदेशक मतदान
**advisory board = advisory body,** सल्लागार मंडळ
**advisory commission on intergovernmental relations,** आंतर शासकीय संबंध सल्लागार आयोग
**advisory committee,** सल्लागार समिति
**advisory council,** सल्लागार परिषद
**advisory jurisdiction,** समुपदेशक अधिकारिता
**advisory opinion,** समुपदेशक मत
**advisory referendum = optional referendum**
**advocate,** *n.* अधिवक्ता (सा.)
**Advocate General,** महा अधिवक्ता
**aerial domain,** हवाई अधिकारक्षेत्र
**aerial reconnaissance,** हवाई टेहळणी
**aerodrome,** *n.* विमानतळ (पु.)
**aeropolitics,** *n.* हवाई सामर्थ्याधारित राजकारण (न.)
**affair,** *n.* १ प्रकरण (न.) २ *pl.* व्यवहार (पु.) ३ घडामोडी (स्त्री. अ. व.)
**affectivity,** *n.* भावनिकता (स्त्री.), प्रभावकता (स्त्री.)
**affidavit,** *n.*१ शपथपत्र (न.) २ प्रतिज्ञालेख (पु.)
**affiliation,** *n.* १ संलग्नीकरण (न.) २ संबद्धीकरण (न.)
**affinal relations,** सोयरेसंबंध (पु. अ. व.)
**affirmation,** *n.* १ दृढकथन (न.) २ होकार (पु.) ३ प्रतिज्ञाकथन (न.)
**Afro-Asian bloc,** आफ्रो-आशियाई गट
**agency,** *n.* अभिकरण (न.), एजन्सी (स्त्री.)
**agency services,** अभिकरण सेवा
**agenda,** *n. pl.* कार्यसूची (स्त्री.)
**agent,** *n.* अभिकर्ता (पु.)
**agent provocateur,** (provoking agent) प्रक्षोभकर्ता (पु.)
**aggregate,** *adj.* एकूण
**aggregation,** *n.* समुच्चयन (न.)
**aggregation of interests,** हितसंबंधांचे समुच्चयन
**aggregative,** *adj.* समुच्चयी
**aggression,** *n.* आक्रमण (न.)
*cf.* raid छापा
**aggressive clique,** आक्रमक कंपू
**agitation,** *n.* आंदोलन (न.), चळवळ (स्त्री.)
**agitational,** *adj.* आंदोलनात्मक
**agnostic,** *n.* अज्ञेयवादी (सा.)
**agnosticism,** *n.* अज्ञेयवाद (पु.)
**agraria industria model,** कृषि-उद्योग प्रतिरूप
**agrarian,** *adj.* कृषिभूमिविषयक, शेतजमीनविषयक
**agrarian law,** कृषिभूमि कायदा, शेतजमीन कायदा
**agrarian party,** कृषकदल (न.), किसानदल (न.)
**agrarian socialism,** कृषक समाजवाद
**agrarian society,** कृषिप्रधान समाज, शेती–प्रधान समाज
**agricultural administration,** कृषि प्रशासन
**agricultural community,** शेतकरी समाज, कृषक समाज
**agricultural marketing board,** कृषि पणन मंडळ, कृषि बाजार मंडळ
**agricultural produce marketing society,** कृषि उत्पन्न बाजार समिति
**agro-industrial,** *adj.* कृषि-औद्योगिक
**agro-industry,** *n.* कृषि-उद्योग (पु.)
**aid,** *n.* सहाय्य (न.), मदत (स्त्री.)
*aide-de-camp,* *n.* परिसहायक (सा.), ए. डी. सी. (सा.)

*aide-memoire*, *n.* स्मरण-सहाय्य सूची (स्त्री.)
air council, वायुसेनापरिषद (स्त्री.)
air ministry, वायुसेना मंत्रालय
air port, हवाईपत्तन (न.)
air space jurisdiction, हवाई अवकाश अधिकारिता
air-to-air missile, आकाशात् आकाश क्षेपणास्त्र
air-to-surface missile, आकाशात् भूमि क्षेपणास्त्र
alderman, *n.* आल्डरमन (पु.)
alien, *n.* अन्यदेशीय (सा.)
*adj.* अन्यदेशीय
alienate, *v.t.* दुरावा निर्माण करणे
alienated labour, १ हतात्म श्रम, नष्टस्व श्रम २ हतात्म श्रमिक, नष्टस्व श्रमिक
alienation, *n.* दूरीभाव (पु.), परात्मभाव (पु.)
alignment, *n.* संलग्नता (स्त्री.)
all-comprehensive, *adj.* सर्वसमावेशक
allegation, *n.* अभिकथन (न.)
allege, *v.t.* अभिकथन करणे
allegiance, *n.* निष्ठा (स्त्री.)
alliance, *n.* युति (स्त्री.)
alliances network, युतिबंध (पु.)
allied countries, मित्रदेश (पु. अ. व.)
allied powers, मित्रराष्ट्र (न.)
All India Services, अखिल भारतीय सेवा
All India Services Rules, अखिल भारतीय सेवा नियम
allocation, *n.* १ वाटप (न.), वाटणी (स्त्री.) २ विल्हेवार वाटप (न.)
allocation functions, वाटप कार्य
allotment, *n.* १ नियत रक्कम (स्त्री.) २ नियत वाटप (न.) ३ भाग वाटप (न.)
all-purpose authority, सार्वहेतुक प्राधिकरण
all things to all men, स्वैर आश्वासने
ally, *n.* मित्रराष्ट्र (न.), दोस्तराष्ट्र (न.)
alternative, *n.* १ विकल्प (पु.) २ पर्याय (पु.)
alternative estimate, पर्यायी अंदाज
amalgamation, *n.* एकत्रीकरण (न.)
amateur, *n.* हौशी (सा.)
ambassador, *n.* परराष्ट्र वकील (सा.)
*cf.* charge-d' affairs कार्यदूत
consul वाणिज्यदूत
envoy दूत, प्रतिनिधि
high commissioner उच्च आयुक्त
plenipotentiary अधिराजदूत
ambiguity, *n.* संदिग्धता (स्त्री.)
ambiguous, *adj.* संदिग्ध
ambilateral kinship, उभयपक्षी नाते
ambivalance, *n.* द्विधावृत्ति (स्त्री.)
amendment, *n.* १ दुरुस्ती (स्त्री.), २ सुधारणा (स्त्री.), विशोधन (न.)
amendment of the Act, अधिनियमाची सुधारणा, अधिनियमाचे विशोधन
amendment of the Constitution, संविधान विशोधन
amends, *n. pl.* प्रतिपूर्ति (स्त्री.)
*cf.* compensation
amenities, *n. pl.* सुखसोयी (स्त्री. अ. व.), सुविधा (स्त्री. अ. व.)
American system, भांडवलशाही व्यवस्था (व्यक्तिगत उपक्रमाला वाव देणारी)
ammunition, *n.* दारूगोळा (पु.)
amnesty, *n.* सर्वक्षमा (स्त्री.)
amorphous, *adj.* अनियतरूप
amulet, *n.* ताईत (पु.)
analogous, *adj.* सदृश
analogy, *n.* १ सादृश्य (न.) २ समधर्मता (स्त्री.), समवृत्तिता (स्त्री.)
anal stage of socialisation, सामाजिकीकरणाची मूलावस्था
analysis, *n.* विश्लेषण (न.)
analytical, *adj.* विश्लेषणात्मक

**analytical check list,** विश्लेषणात्मक तपासणी सूची
**anarchism,** *n.* अराज्यवाद (पु.)
**anarchist,** *n.* अराजक माजवणारा (पु.), अराज्यवादी (सा.)
**anarcho-syndicalism** = syndicalism
**anarchy,** *n.* अराजक (न.), अराजकता (स्त्री.)
**ancestor worship,** पूर्वजपूजा (स्त्री.)
**Anglo-Indian,** *n.* अँग्लो इंडियन (सा.)
**animalism,** *n.* चेतनवाद (पु.)
**animism,** *n.* जीवात्मवाद (पु.)
**animistic,** *adj.* जीवात्मवादी
**annex,** *v.t.* १ जोडणे, अनुबद्ध करणे २ (as, province, country) सामील करून घेणे, खालसा करणे
**annexation,** *n.* जोडून घेणे (न.), अनुबंधन (न)
**annexure,** *n.* जोडपत्र (न.)
**annual financial statement,** वार्षिक वित्तीय विवरणपत्र
**annual report,** वार्षिक अहवाल, वार्षिक प्रतिवृत्त
**annuity,** *n.* वर्षासन (न.), वार्षिकी (स्त्री.)
**annul,** *v.t.* विलोपन करणे *cf.* cancel
**anomalous,** *adj.* असंगत
**anomaly,** *n.* असंगति (स्त्री.)
**anomie,** *n.* अतिचार (पु.)
**ans chluss,** *n.* राजकीय किंवा आर्थिक एकीकरण (न.) (१३ मार्च १९३८ रोजी हिटलरने ऑस्ट्रिया जर्मनीस जोडून घेतला. त्याला २० एप्रिल १९३८ रोजी सार्वमताद्वारे ऑस्ट्रियाच्या मतदारांनी दिलेली मान्यता)
**antagonistic,** *adj.* विरोधी
**antecedent publicity and consultation,** पूर्ववर्ती प्रसिद्धी व सल्लामसलत
**ante-date,** *v.t.* पूर्वदिनांकित करणे, मागील तारीख टाकणे
**anthropometry,** *n.* मानवमिति (स्त्री.)
**anti-aircraft,** *adj.* विमानवेधी
**anti-ballastic missile system,** क्षेपणास्त्र प्रतिरोधक पद्धति
**anti-Comintern pact,** कॉमिंटर्न विरोधी करार
**anti-democratic,** *adj.* लोकशाहीविरोधी
**anti-federalist,** *n.* संघराज्यवादविरोधी (सा.)
**anti-missile,** *n.* प्रतिक्षेपणास्त्र (न.)
*adj.* क्षेपणास्त्रविरोधी
**antipathy,** *n.* सहजवैर (न.)
**antiquity,** *n.* १ प्राचीनता (स्त्री.) २ प्राचीन काळ (पु.)
**anti-semitism,** *n.* ज्यू विरोधवाद (पु.)
**anti-social,** *adj.* समाजविरोधी
**antithesis,** *n.* प्रतिस्थिति (स्त्री.)
**ANZUS TREATY,** अंझुस करार (ऑस्ट्रेलिया व न्युझीलंड यांच्याशी अमेरिकेने सॅन-फ्रॅन्सिस्को येथे १९५१ मध्ये केलेला परस्पर सुरक्षा करार)
**apartheid,** *n.* वर्णविद्वेष (पु.)
**apathetic,** *adj.* उदासीन
**apathy,** *n.* उदासीनता (स्त्री.)
**apodictic,** *adj.* निर्विवाद
*a posteriori*, अनुभवोत्तर, अनुभवसापेक्ष
**apostolic,** *n.* प्रेषिती (सा.)
**appeal,** *n.* अपील (न.)
**appeal committee,** अपील समिति
**appeal procedure,** अपील कार्यपद्धति
**appeasement policy,** अनुनय धोरण
**appellate,** *adj.* अपिलीय, अपील-
**appellate jurisdiction,** अपील अधिकारिता
**appendix,** *n.* परिशिष्ट (न.)
**application,** *n.* उपयोजन (न.)
**apply,** *v.t.& i.* (as, Acts) प्रयुक्त करणे, प्रयुक्त होणे, (as, rules) लागू करणे, लागू होणे *cf.* enforce जारी करणे, अंमलात आणणे, प्रवर्तन करणे

implement कार्यान्वित करणे
operate प्रवर्तित होणे
**appointing authority,** नियुक्ति प्राधिकारी
**appointment,** *n.* १ नियुक्ति (स्त्री.), नेमणूक (स्त्री.) २ नियत भेट (स्त्री.)
**appointment power,** १ नियुक्ति शक्ति २ नेमणुकीचे अधिकार
**apportion,** *v.t.* संविभाजन करणे
**apportioned,** *adj.* संविभाजित
**apportionment,** *n.* संविभाजन (न.)
**approach,** *n.* दृष्टिकोन (पु.)
**approach road,** उपमार्ग (पु.), पोचमार्ग (पु.)
**approbation,** *n.* अनुशंसा (स्त्री.), अनुशंसन (न.)
**appropriation,** *n.* विनियोजन (न.)
**appropriation account,** विनियोजन लेखा
**appropriation Act,** विनियोजन अधिनियम
**appropriation Bill,** विनियोजन विधेयक
**appropriation committee,** विनियोजन समिति
**approver,** *n.* माफीचा साक्षीदार (सा.)
*a priori,* अनुभवपूर्व, प्रागनुभव–
*a priori* **assumption,** अनुभवपूर्व गृहीतक
**aptitude test,** अभियोग्यता चाचणी
**arbitrary,** *adj.* स्वेच्छानुसारी, मनमानी
**arbitration,** *n.* १ लवाद (पु.) २ लवाद-निर्णय (पु.)
**archaic,** *adj.* आर्ष
**archtype,** *n.* आद्यरूप (न.)
**area,** *n.* क्षेत्र (न.)
**arena,** *n.* आखाडा (पु.), रिंगण (न.)
**aristocracy,** *n.* १ अभिजातवर्ग (पु.) २ अभिजनसत्ता (स्त्री.)
**aristocrat,** *n.* अभिजातवर्गीय (सा.)
**aristocratic,** *adj.* अभिजात, खानदानी
**Armageddon,** *n.* आर्मागेडॉन (न.) (अनिष्ट समजल्या जाणाऱ्या शक्तींविरुद्धचे युद्ध उदा. : पहिले महायुद्ध)
**armchair strategist,** सुखासीन राजकारणी, पर्यंकी राजकारणी, आरामखुर्चीतील राजकारणी
**armed forces,** सशस्त्र बल
**armed neutrality,** शस्त्रसज्ज तटस्थता
**armed revolution,** सशस्त्र क्रांति
**armistice,** *n.* शस्त्रसंधि (पु.)
**arms,** *n.* शस्त्रे (न. अ. व.)
**Arms Act,** शस्त्र अधिनियम
**arms control,** शस्त्रास्त्र नियंत्रण
**arms embargo,** शस्त्र अधिरोध
**arms race,** शस्त्र स्पर्धा, शस्त्रास्त्र स्पर्धा
**arms truce,** विरामसंधि (पु.)
**army engineers' corps,** सेना अभियंता दल
**army of occupation,** व्यापी सेना, ताबा घेणारी सेना
**arraignment,** *n.* न्यायालयीन समुपस्थापन (न.)
**arrears,** *n.* १ थकबाकी (स्त्री.) २ थकित काम (न.)
**arriviste ,** *n.* स्वार्थसाधू (सा.) (राजकारणी)
**arrogance of power,** सत्तामद (पु.)
**arrogate,** *v.t.* अनधिकारतः ग्रहण करणे, अनधिकारतः दावा सांगणे
**arrondissement,** *n.* अरॉन्दिस्मा (पु.) (फ्रान्स-मधील स्थानिक शासनाचे निर्वाचन क्षेत्र किंवा शासनाचा प्रशासनिक घटक)
**arsenal of democracy,** लोकशाहीचे शस्त्रागार, लोकशाहीचे आयुधभांडार
**artefact,** *n. pl.* मानवनिर्मित वस्तू (स्त्री.)
**article,** *n.* अनुच्छेद (पु.)
**articulate,** *adj.* अभिव्यक्त
**articulate major premise,** अभिव्यक्त प्रधान आधारविधान
**articulation,** *n.* अभिव्यक्तीकरण (न.)
**art of the possible,** संभाव्यलक्षी कुशलता
**ascribe,** *v. t.* अध्यारोप करणे
**ascribed,** *adj.* सिद्ध

**ASEAN,** (Association of South-East Asian Nations) **असोसिएशन ऑफ साऊथ-ईस्ट एशियन नेशन्स** (इंडोनेशिया, मलेशिया, फिलिपिन्स, सिंगापूर, थायलंड यांनी आर्थिक व सामाजिक विकासासाठी १९६७ मध्ये स्थापन केलेली प्रादेशिक संघटना)

**assassin** = **assassinator**

**assassinate,** *v. t.* **हत्या करणे, जिवे मारणे**

**assassinator,** *n.* (*also* **assassin**) **हत्यारा** (पु.), **मारेकरी** (पु.)

**assault,** *n.* **हमला** (पु.)

**assay office, पारख कार्यालय**

**assembly,** *n.* १ **सभा** (स्त्री.) (as in : Legislative Assembly विधानसभा) २ *Law* **जमाव** (पु.) (as in : unlawful assembly बेकायदेशीर जमाव)

**assent,** *n.* **अनुमति** (स्त्री.)

*cf.* acceptance स्वीकृति, स्वीकार
acquiescence मूकसंमति
concurrence सहमति
consent संमति
ratification अनुसमर्थन
*v. t.* **अनुमती देणे**

**assessed taxes, निर्धारित कर**

**assessment,** *n.* १ **आकारणी** (स्त्री.) *cf.* duty २ **निर्धारण** (न.)

**assets,** *n. pl.* **मत्ता** (स्त्री.)

**assets and liabilities, मत्ता व दायित्वे**

**assign,** *n.* **अभिहस्तांकिती** (सा.)

**assignment,** *n.* **अभिहस्तांकन** (न.)

**assimilation,** *n.* **सात्मीकरण** (न.)

**assistance,** *n.* **साहाय्य** (न.)

**associate,** *n.* **सहयोगी** (सा.)

**association,** *n.* १ **संघ** (पु.)

*cf.* board मंडळ
body संस्था, निकाय
committee समिति
confederation राज्यसंघ
corporation महामंडळ, निगम
federation संघराज्य
organisation संघटना
society संस्था, मंडळी
syndicate संहति
union संघ

२ **साहचर्य** (न.)

**assume,** *v.t.* **गृहीत धरणे**

**assumption,** *n.* **गृहीत** (न.)

**assurances committee, आश्वासन समिति**

**assured destruction, अपेक्षित विनाश, खात्रीचा विनाश**

**astronaut,** *n.* **अंतराळवीर** (पु.)

**astronautics,** *n.* १ **अंतराळ वाहन विज्ञान** (न.) २ **अंतराळविद्या** (स्त्री.)

**asylum,** *n.* १ **आश्रय** (पु.) २ **आश्रय-स्थान** (न.)

**asymmetry,** *n.* **असममिति** (स्त्री.)

**Atlantic Charter, ॲटलांटिक सनद** (१९४१ च्या ऑगस्टमध्ये ॲटलांटिक महासागरावरील एका युद्धनौकेवर रुझवेल्ट व चर्चिल यांच्यामध्ये दुसऱ्या महायुद्धानंतरच्या जागतिक पुनर्रचनेसंबंधी करण्यात आलेली घोषणा)

**Atlantic community, ॲटलांटिक** (राष्ट्र) **समुदाय**

**atom bomb, अणु बाँब**

**atom-free zone, अणुमुक्त क्षेत्र**

**atomic energy, अणुऊर्जा** (स्त्री.), **अणुशक्ति** (स्त्री.)

**atomic energy commission, अणुऊर्जा आयोग**

**atomic holocaust, अण्वस्त्र विध्वंस**

**atomization,** *n.* **गट भंजनीकरण** (न.) (व्यक्तीला दुर्बल करून तिची राजसत्तेवरील अवलंबिता वाढवणे)

**attach,** *v.t.* & *i.* १ **जप्ती आणणे, टाच आणणे**

*cf.* confiscate अधिहरण करणे, सरकार-जमा करणे
distrain अटकावून ठेवणे
distress अटकावणी लावणे
forfeit १ समपहरण करणे २ गमावणे
seize अभिग्रहण करणे, जप्त करणे
२ संलग्न करणे, संलग्न होणे, जोडणे

**attached office,** संलग्न कार्यालय
**attachment,** *n.* टाच (स्त्री.), जप्ती (स्त्री.)
**attack,** *n.* हल्ला (पु.)
**attain majority,** सज्ञान होणे
**attentive public,** जागरूक जनता
**attenuation,** *n.* क्षीणन (न.)
**attitude,** *n.* अभिवृत्ति (स्त्री.)
**attitude scaling,** अभिवृत्ति अनुमापन
**attorney,** *n.* १ मुखत्यार (सा.) २ न्याय-वादी (सा.)
**Attorney General,** महान्यायवादी (सा.)
**attribute,** *n.* गुणविशेष (पु.)
**audit,** *n.* लेखापरीक्षा (स्त्री.)
**audit control,** लेखापरीक्षा नियंत्रण
**auditing,** *n.* लेखापरीक्षण (न.)
**auditor,** *n.* लेखापरीक्षक (सा.)
**Auditor General,** महालेखापरीक्षक (सा.)
**autarchy = autarky,** *n.* (national economic self-sufficiency) निरंकुश सत्ता (स्त्री.) (राष्ट्रीय आर्थिक स्वयंपूर्णता)
**authenticate,** *v.t.* अधिप्रमाणन करणे
**authorisation,** *n.* १ प्राधिकरण (न.) २ प्राधिकारपत्र (न.)
**authorise,** *v. t.* प्राधिकार देणे, प्राधिकृत करणे
**authoritarian,** *adj.* १ प्राधिकारवादी २ स्वामित्व प्रधान ३ सत्तावादी
**authoritarianism,** *n.* प्राधिकारवाद (पु.)
**authority,** *n.* १ प्राधिकारी (सा.) २ प्राधिकरण (न.) ३ प्राधिकारपत्र (न.) ४ प्राधिकार (पु.)
**authority and leadership,** प्राधिकार व नेतृत्व
**authority of state,** राज्याचा प्राधिकार
**autocracy,** *n.* एकतंत्र पद्धति (स्त्री.)
**autocrat,** *n.* एकतंत्री (सा.)
**autocratic,** *adj.* एकतंत्री, एकतंत्र—
**automation,** *n.* स्वयंचलन (न.)
**autonomous,** *adj.* स्वायत्त
**autonomous region,** स्वायत्त प्रदेश
**autonomy,** *n.* स्वायत्तता (स्त्री.)
**auxiliary agency,** सहाय्यकारी अभिकरण
**auxiliary legislation,** सहाय्यकारी विधिविधान
**auxiliary officer,** सहाय्यकारी अधिकारी
**avalanche,** *n.* सतवर्षाव (पु.)
**avoidance,** *n.* वर्जन (न.) (as in : customs of avoidance वर्जनरूढी)
**avoidance relationship,** वर्जनसंबंध (पु.)
**avulsion,** *n.* अपदारण (न.)
**avunculate,** *n.* मातुल वर्चस्व (न.)
**award,** *n.* १ निवाडा (पु.) २ पुरस्कार (पु.)
**axiom,** *n.* गृहीतक (न.)
**axis,** *n.* १ अक्ष (पु.) २ गट्टी राष्ट्र (न.), अक्ष राष्ट्र (न.)
**ayes,** *n. pl.* 'होय' पक्षी (सा.)

# B

**backbencher,** *n.* मागील बाकावरील सदस्य (सा.), पश्चासीन सदस्य (सा.)
**backer,** *n.* पाठीराखा (पु.), आर्थिक पाठबळ देणारा (पु.)
**backgrounder,** *n.* १ गुप्तसूत्री वृत्त (न.) २ पृष्ठभूमिलेख (पु.)
**backlash,** *n.* उलटा फटकारा (पु.), प्रत्याघात (पु.)
**bacteriological warfare,** अणुजीव युद्ध
**bad tendency rule,** स्वातंत्र्य अपलापविरोधी नियम
**Baghdad Pact, (CENTO)** ( Central Treaty Organisation) बगदाद करार (सेंटो) (द्वितीय महायुद्धोत्तर कालामधील अमेरिका प्रणित लष्करी करार–संघटनांपैकी एक; १९५५ मध्ये पाकिस्तान, इराण, इराक, तुर्कस्थान व ग्रेट ब्रिटन यांनी मुख्यत्वे रशियाच्या विस्तारवादाविरुद्ध केलेला करार. १९५८ मध्ये इराकमधील क्रांतीनंतर हा करार 'सेंटो करार' म्हणून ओळखला जातो.)
**bagman,** *n.* लाचदलाल (पु.)
**bail,** *n. Law* १ जमानतदार (सा.) २ जमानत (स्त्री.)
*v. t. Law* १ ( to set free on bail ) जमानतीवर सोडणे २ (वस्तूंचा) निक्षेप करणे
**balanced budget,** समतोल अर्थसंकल्प, संतुलित अर्थसंकल्प
**balanced constitution,** संतुलित संविधान
**balance of power,** १ शक्ति संतुलन, शक्ति समतोल २ सत्ता संतुलन, सत्ता समतोल
**balance of terror,** दहशत संतुलन
**balance of trade,** व्यापारशेष (पु.)
**balancing doctrine,** संतुलन सिद्धांत
**balkan entente,** बाल्कन गट
**balkanization,** *n.* विखंडन करणे (न.), तुकडे करणे (न.), तुकडे होणे (न.)
**ballot,** *n.* १ मतपत्रिका (स्त्री.) २ गुप्त मतदान (न.)
*v. t.* चिठ्ठ्या टाकणे, मतदान करणे
**ballot paper,** मतपत्रिका (स्त्री.)
**bamboo curtain,** बांबू पडदा
**Bandung Conference,** बांडुंग परिषद (१९५५ मध्ये बांडुंग (इंडोनेशिया) येथे भरलेली आफ्रो–आशियाई परिषद)
**banish,** *v. t.* हद्दपार करणे
*cf.* deport तडीपार करणे
exile देशपार करणे
expatriate स्वदेशनिष्कासित करणे
extradite –चे प्रत्यर्पण करणे
transport काळ्या पाण्यावर पाठवणे
**bank,** *n.* अधिकोष (पु.), बँक (स्त्री.)
**bank return,** बँक विवरण
**banner district,** आघाडीचा मतदारसंघ

**bargaining,** *n.* १ सौदेबाजी (स्त्री.) २ सौदा (पु.)
**bargaining power,** सौदाशक्ति (स्त्री.)
**barter,** *n.* वस्तुविनिमय (पु.) *v.t.* वस्तुविनिमय करणे
**basic,** *adj.* मूळ, मूलभूत, पायाभूत
**basic structure,** मूलभूत संरचना
**basic training,** मूलभूत प्रशिक्षण
**basic unit,** मूलभूत घटक, पायाभूत घटक
**becoming,** *n.* संभवन (न.) *adj.* संभवनात्मक
**behaviour,** *n.* वर्तन (न.)
**behaviouralism,** *n.* वर्तनवाद (पु.)
**behaviouralist,** *n.* वर्तनवादी (सा.)
**behavioural science,** वर्तनवादीशास्त्र (न.)
**behaviour pattern,** वर्तन बंध
**being,** *n.* असतेपण (न.)
**Belgrade Conference,** बेलग्रेड परिषद (असंलग्न राष्ट्रांची पहिली परिषद : १९६१)
**belief,** *n.* १ विश्वास (पु.) २ *pl.* समजुती (स्त्री. अ. व.)
**belligerency,** *n.* युध्यमानता (स्त्री.), युद्धावस्था (स्त्री.)
**belligerent,** *adj.* (carrying on war or engaged in war) युध्यमान
**bellwether,** *n.* (मत्त) दिक् सूचक (पु.)
**benefice,** *n.* धर्मस्व (न.)
**benefits and allowances,** लाभ आणि भत्ते
**benevolent,** *adj.* लोकहितैषी
**benevolent despot,** लोकहितैषी निरंकुश शासक, लोकहितैषी स्वैरतंत्री
**benign neglect,** सद्हेतुक दुर्लक्ष
**Berlin Rome axis,** बर्लिन रोम गट्टी
**Berne convention,** बर्न अभिसंधि
**Beveridge plan,** बेव्हरीज योजना (१९४२ साली ब्रिटनमध्ये बेव्हरीज समितीने सुचवलेली सामाजिक सुरक्षाविषयक कल्याण योजना)
**biannual,** *adj.* अर्धवार्षिक
**bibliography,** *n.* १ अभ्यासवाङमय सूची (स्त्री.) २ ग्रंथसूची (स्त्री.)
**bicameral,** *adj.* द्विसदन--, द्विसदनीय, द्विगृही
**bicameralism,** *n.* द्विसदनवाद (पु.)
**bicameral legislature,** द्विसदन विधानमंडळ, द्विगृही विधानमंडळ
**bicameral system,** द्विसदनीय पद्धति, द्विगृही पद्धति
**biennial,** *adj.* (appearing every two years) द्विवार्षिक
**biennial session,** द्विवार्षिक सत्र
**bifurcation,** *n.* द्विशाखन (न.), दुभागणी (स्त्री.)
**bigamy,** *n.* द्विविवाहितत्व (न.)
**big stick policy,** दंडभयदर्शी धोरण
**Big Three,** बडे तिघे (ब्रिटन, अमेरिका व रशिया यांची दुसऱ्या महायुद्धातील युती)
**bilateral,** *adj.* उभयपक्षी, द्विपक्षी
**bilateral aid,** उभयपक्षी सहाय्य
**bilateral descent,** उभयपक्षीय वंशक्रम
**bill,** *n.* १ विधेयक (न.) २ बिल (न.)
**bill drafting,** विधेयकाचे मसुदालेखन
**Bill of Rights,** बिल ऑफ राईटस (इंग्लंड--१६८९), अधिकार विधेयक
**bilocal,** *adj.* उभयस्थानिक
**biological existence,** जैविक अस्तित्व
**biological factor,** जैविक घटक
**biological warfare,** जैविक युद्ध
**bipartisanship,** *n.* द्विपक्षसंमतितत्व (न.)
**bi-polar,** *adj.* द्विध्रुवी
**bipolarity,** *n.* द्विध्रुवता (स्त्री.)
**bipolar system,** द्विध्रुवी पद्धति
**birthright,** *n.* जन्मसिद्ध अधिकार (पु.), जन्मसिद्ध हक्क (पु.)

black magic, चेटूक (न.), जादूटोणा (पु.), विनाशकारी जादू
blackmail, *v.t.* धमकीने पैसे उकळणे
blackmailer, *n.* बिगजीवी (पु.)
Black Muslims, निग्रो मुस्लीम (अमेरिकेतील निग्रो मुस्लीमांची कृष्णवर्णीयांच्या श्रेष्ठत्वाचा आणि वांशिक स्वातंत्र्याचा पुरस्कार करणारी चळवळ)
blackout, *n.* प्रकाशबंदी (स्त्री.)
Black Panther Party, (U. S. A.) ब्लॅकपँथर पार्टी (कृष्णवर्णीयांची अमेरिकेतील नागरी हक्क संरक्षणासाठी स्थापलेली लढाऊ संघटना)
blanket sanction, व्यापक मंजुरी
blitzkrieg, *n.* वीजवेगी हल्ला (पु.)
block, *n.* गट (पु), खंड (पु.)
blockade, *n.* नाकेबंदी (स्त्री.)
block grant, एकरकमी अनुदान, गट अनुदान
block voting, गट मतदान
blood-feud, *n.* कुलवैर (न.)
bloodless revolution, रक्तहीन क्रांति
bloody revolution, रक्तरंजित क्रांति
Blue Book, ब्ल्यू बुक (ब्रिटिश संसदेचे निळ्या वेष्टनाचे प्रकाशन)
blue collar workers, श्रमजीवी कर्मचारी
blueprint, *n.* आराखडा (पु.), नीलप्रत (स्त्री.), नीलमुद्रित (न.)
board, *n.* मंडळ (न.) *cf.* association
board of admiralty, नाविक मंडळ, नौअधिकरण मंडळ
board of directors, संचालक मंडळ
board of education, शिक्षण मंडळ
board of examiners, परीक्षक मंडळ
board of trade, व्यापार मंडळ
body, *n.* संस्था (स्त्री.), निकाय (पु.) *cf.* association
body corporate, निगम निकाय
body of laws, विधिसंग्रह (पु.)
body Politic, राज निकाय
Bolsheviks, *n. pl.* बोल्शेविक (सा. अ. व.)
bolshevism, *n.* बोल्शेविकवाद (पु.) (रशियामधील लेनिनप्रभृतीप्रणीत क्रांतिपूर्व काळातील मार्क्सवादी विचारसरणी)
*bona fide, adj. Law* १ सद्भावमूलक, सद्भावपूर्ण २ खराखुरा, वास्तविक ३ प्रामाणिक
*adv.* सद्भावपूर्वक
*bona fides, n. Law* १ (good faith) सद्भाव (पु.), २ (genuineness) खरेपणा (पु.)
bonded labour, वेठबिगार (सा.)
Book burners, स्वयंमन्य संस्कृतिरक्षक
border dispute, सरहद्दवाद (पु.)
border states, सरहद्दीलगतची राज्ये
borough, *n.* बरो (पु.), बरो नगरपरिषद (स्त्री.)
borrowing, *n.* १ कर्ज (न.) २ उसनवारी (स्त्री.)
bossism, *n.* साहेबगिरी (स्त्री.) (राजकीय कारस्थानातील सूत्रचालन)
boundary, *n.* सीमा (स्त्री.)
boundary dispute, सीमावाद (पु.)
bourgeoisie, *n. pl.* बूर्झ्वा वर्ग (पु.)
bourgeois revolution, बूर्झ्वा क्रांति
boycott, *n.* बहिष्कार (पु.)
brain-drain, *n.* बुद्धिमंतांचे अपगमन (न.)
brain trust, १ निकटतम तज्ञगट २ जाणकार गट
brainwashing, *n.* बुद्धिप्रक्षालन (न.)
branch, *n.* शाखा (स्त्री.)
breach of law, विधिभंग (पु.)
breach of peace, शांतताभंग (पु.)
breach of privilege, विशेषाधिकारभंग (पु.)
bread and butter issue, भाकरीचा प्रश्न
break-even point, आयव्यय संतुलन बिंदु

**bridge-building,** *n.* सांधणी (स्त्री.)
**brief,** *v.t.* टाचण करून देणे
*n.* *Law* मिसल (स्त्री.)
*adj.* त्रोटक, संक्षिप्त
**brinkmanship,** *n.* सीमांतवर्तिता (स्त्री.)
**British Commonwealth of Nations,** राष्ट्रकुल (न.)
**broadcasting,** *n.* ध्वनिक्षेपण (न.), प्रसारण (न.)
**brokerage,** *n.* (the commission of a broker) दलाली (स्त्री.)
*cf.* commission अडत, कमिशन
concession सवलत
deduction वजात
discount वट्टा, कसर
drawback करप्रतिग्रह
percentage टक्केवारी, शेकडेवारी
rebate वटाव
reduction घट
remission सूट
set-off वजावट
**brotherhood,** *n.* १ बंधुत्व (न.) २ बंधुगण (पु.)
**budget,** *n.* अर्थसंकल्प (पु.)
**balanced budget** समतोल अर्थसंकल्प, संतुलित अर्थसंकल्प
**capital budget** भांडवली अर्थसंकल्प
**deficit budget** तुटीचा अर्थसंकल्प
**revenue budget** महसुली अर्थसंकल्प
**revised budget** सुधारित अर्थसंकल्प
**surplus bugdet** शिलकी अर्थसंकल्प
**Budget and Accounting Act,** अर्थसंकल्प व लेखांकन अधिनियम
**budgetary procedure,** अर्थसंकल्पविषयक कार्यपद्धति, अर्थसंकल्पीय प्रक्रिया
**budget bureau,** अर्थसंकल्प विभाग
**budget cycle,** अर्थसंकल्पीय चक्र
**budget enactment,** अर्थसंकल्पविषयक अधि-नियमन
**budget estimate,** अर्थसंकल्पीय अंदाज
**budget examiner,** अर्थसंकल्प परीक्षक
**budgeting,** *n.* अर्थसंकल्पन (न.)
**budgeting management,** अर्थसंकल्पन व्यवस्थापन
**budgeting system,** अर्थसंकल्पन पद्धति
**budget programme,** अर्थसंकल्प कार्यक्रम
**buffer state,** मध्यगत राष्ट्र
**Bundesrat,** *n.* बुंडेस्राट (पु.) (जर्मन विधिमंडळातील वरिष्ठ सदन)
**Bundestag,** *n.* बुंडेस्टाग (पु.) (जर्मन विधिमंडळातील कनिष्ठ सदन)
**bureau,** *n.* १ (as, office) केंद्र (न.)
२ (as, department) विभाग (पु.)
**bureaucracy,** *n.* नोकरशाही (स्त्री.)
**bureaucratic infra-structure,** अधिकारवर्गीय आधार-संरचना
**bureaucratic laws,** नोकरशाहीचे कायदे, अधिकारीवर्गाचे कायदे
**bureaucratisation,** *n.* नोकरशाहीकरण (न.)
**bureau of budget,** ब्यूरो ऑफ बजेट
**bureau of reclamation,** पुनःप्रापण केंद्र
**burgess,** *n.* पौर (सा.)
**Burgomaster,** *n.* (Germany) बर्गोमास्टर (पु.)
**burial,** *n.* दफन (न.)
**business administration,** व्यापार प्रशासन
**business advisory committee,** कामकाज सल्लागार समिति
**bye-election,** *n.* पोटनिवडणूक (स्त्री.)
**byelaw=bylaw,** *n.* उपनियम (पु.)
**by lots,** चिठ्ठ्या टाकून

